अभियोग संचालनालयाच्या अधिपत्त्याखालील
सहाय्यक सरकारी अभियोक्ता (गट-अ ) यांना
महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाने दिनांक
०७.०१.२०१० रोजी दिलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने
सुधारीत वेतनश्रेणी मंजूर करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**

शासन निर्णय क्रमांक : न्यायप्र-२०१०/१०९३/प्र.क्र.१५/पोल-१०
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२ दिनांक : ७ एप्रिल, २०११

**प्रस्तावना** :- संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या नियंत्रणाखालील सहायक सरकारी अभियोक्ता, गट-अ या संवर्गासाठी रु.७४५०-११५०० या वेतनश्रेणीऐवजी रु.८०००-१३५०० ही वेतनश्रेणी लागु करण्याबाबत श्री.एस.व्ही.चौधरी व इतर यांनी महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, औरंगाबाद येथील मुळ अर्ज क्रमांक १११/२००२ दाखल केला होता. न्यायाधिकरणाने दिनांक ०७.०१.२०१० रोजी असा निर्णय दिला आहे की, महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने स्पर्धात्मक परीक्षेव्दारे शिफारस केलेल्या सहायक सरकारी अभियोक्ता (गट-अ) या पदावरील अधिका-यांना दिनांक ०१.०१.१९९६ पासून रु.८०००-२७५-१३५०० ही वेतनश्रेणी परिणामकारक आर्थिक लाभासह देण्यासंबंधीचे आदेश दोन महिन्यात निर्गमित करावेत व पुढील दोन महिन्यात त्यांची थकबाकी अदा करण्यात यावी. या निर्णयाविरुध्द शासनाच्या वतीने उच्च न्यायालय, औरंगाबाद खंडपीठ, औरंगाबाद येथे रिट याचिका क्रमांक ८४७४/२०१० दाखल करण्यात आली होती. या याचिकेत उच्च न्यायालयाने दिनांक ०४.१०.२०१० रोजी दिलेल्या निर्णयानुसार महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाच्या निर्णयास स्थगिती दिलेली नाही. उच्च न्यायालयाच्या निर्णयाविरुध्द शासनाने सर्वोच्च न्यायालयात स्पेशल लिव्ह टू अपील (सिव्हील) सीसी ९७२/२०११ दाखल केले होते. सर्वोच्च न्यायालयाने दिनांक १८.०१.२०११ रोजी उच्च न्यायालयाच्या आदेशात हस्तक्षेप करण्यास नकार देऊन स्पेशल लिव्ह पिटीशन खारीज केले आहे.

२. उपरोक्त परिस्थितीत महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाने दिनांक ०७.०१.२०१० रोजी दिलेल्या निर्णयानुसार महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने स्पर्धात्मक परीक्षेव्दारे शिफारस केलेल्या सहायक सरकारी अभियोक्ता (गट-अ) या पदावरील अधिका-यांना दिनांक ०१.०१.१९९६ पासून रु.८०००-२७५-१३५०० ही वेतनश्रेणी परिणामकारक आर्थिक लाभासह देण्यासंबंधीचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय** :- महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाने दिनांक ०७.०१.२०१० रोजी दिलेल्या निर्णयानुसार महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने स्पर्धात्मक परीक्षेव्दारे शिफारस केलेल्या सहाय्यक सरकारी अभियोक्ता (गट-अ) या पदावरील अधिका-यांना दिनांक ०१.०१.१९९६ पासून रु.८०००-२७५-१३५०० ही वेतनश्रेणी (परिणामकारक आर्थिक लाभासह) उच्च न्यायालयातील रिट याचिका क्रमांक ८४७४/२०१० मधील अंतीम निर्णयाच्या अधीन राहून लागू करण्यात येत आहे. त्यानुसार त्यांना देय होणारी संपूर्ण थकबाकी संबंधिताकडून बंधपत्र घेऊन दोन महिन्यात अदा करण्यात यावी.

२. शासनाने दाखल केलेल्या रिट याचिका क्रमांक ८४७४/२०१० वरील उच्च न्यायालयाचा निर्णय राज्य शासनाच्या बाजूने झाल्यास, संबंधीत लाभार्थीकडून अतिप्रदान झालेली रक्कम वसूल करण्यात येईल. त्यासाठी "शासनाच्या बाजूने उपरोक्त अपीलाचा निर्णय झाल्यास थकबाकीची रक्कम शासनास परत करण्यात येईल" अशा आशयाची क्षतिपूर्ती बंधपत्रे ( Indemnity Bond ) संबंधीत लाभार्थ्यांकडून भरुन घेण्यात यावीत. तसेच सुधारित वेतनश्रेणीत वेतननिश्चितीसाठी द्यावयाचा विकल्प संबंधीत लाभार्थ्यांना द्यावा लागेल.

३. प्रस्तुत शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीनुसार त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक : अनौस-७२/सेवा-९, दिनांक २१.०२.२०११ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय राज्य शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक २०११०४०६२३०२५६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( रा.दा. संखे )

सह सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,

संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य,मुंबई
महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
सर्व उप संचालक, अभियोग संचालनालय,
सर्व सहायक संचालक व सरकारी अभियोक्ता
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,मुंबई
वित्त विभाग (सेवा-९), मंत्रालय,मुंबई
निवड नस्ती (पोल-१०), गृह विभाग